**अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका, मदतनीस यांचे मानधन जुन्या पध्दतीने आहरित करुन अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - १५ मार्च, २०२२

**संदर्भ :-** (१) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः- एबावि-२०१५/प्र.क्र.२७९/का.६, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१७.
(२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/का-३/ लेखा/५३२७/२०२०-२१,दिनांक १६ डिसेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सर्व अंगणवाडी सेविका,मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन PFMS प्रणालीद्वारे सेविका / मदतनीसांच्या बँक खात्यात थेट जमा करण्याची कार्यपध्दती सन २०१७ पासून सुरु करण्याबाबतचे आदेश संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. तथापि, तांत्रिक अडचणीमुळे काही अंगणवाडी सेविका,मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांचे माहे एप्रिल, २०२१ पासून आयुक्तालय स्तरावरून PFMS प्रणालीद्वारे मानधन अदा करणे शक्य झालेले नाही. त्यानुषंगाने आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांनी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात ज्या अंगणवाडी सेविका / मदतनीस यांचे मानधन तांत्रिक कारणांमुळे PFMS पध्दतीने अदा करता येऊ शकले नाही त्यांचे मानधन जुन्या पध्दतीने प्रकल्पस्तरावरून आहरित करुन अदा करणेबाबत शासन स्तरावरून योग्य ते आदेश निर्गमित होण्याबाबत संदर्भाधीन क्र. २ च्या पत्रान्वये विनंती केली आहे. त्यानुषंगाने निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत कार्यरत ज्या अंगणवाडी सेविका/मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन तांत्रिक कारणांमुळे PFMS प्रणालीद्वारे अदा करणे शक्य झालेले नाही. अशा अंगणवाडी सेविका/मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविका यांचे प्रलंबित राहिलेले मानधन अदा करण्याकरीता शेवटची संधी म्हणून **दिनांक ३१ मार्च, २०२२** पर्यंत जुन्या पद्धतीने आहरीत करून अदा करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१५१६३९४५८०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2022.03.22 14:15:19 +05'30'

**( महेश वरूडकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (महिला व बाल विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
६) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास
७) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(जिल्हा परिषद)
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी )
१३) निवड नस्ती (कार्यासन ६)